**परिविक्षाधीन उप जिल्हाधिकारी व तहसिलदार "गट-अ" संवर्गात प्रशिक्षण कालावधीकरीता १६ अधिसंख्य पदे निर्माण करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
शासन निर्णय क्रमांक : ईएसटी-२०१६/प्र.क्र.११२/ई-८
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १७/०१/२०१७.

**संदर्भ:-** १) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. ईएसटी-२०१६/प्र.क्र.११२/ई-८, दि. ०५/०७/२०१६.
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. संकीर्ण-२०१६/प्र.क्र.१७४/ई-२, दि. १५/१०/२०१६.
३) शासन आदेश, महसूल व वन विभाग, क्र. पदनि-१२१६/प्र.क्र.१३५/ई-३, दि. १५/१०/२०१६.
४) शासन आदेश, महसूल व वन विभाग, क्र. पदनि-१२१६/प्र.क्र.१३५/ई-३, दि. १९/१०/२०१६.
५) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. ईएसटी-२०१६/प्र.क्र.११२/ई-८, दि. १९/१२/२०१६.
६) विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे यांचे पत्र क्र. /लेखा ५/आरआर/३९०/१६, दि. १९/१२/२०१६.

**प्रस्तावना:-**

संदर्भ क्र. १ व ५ येथील अनुक्रमे दि. ०५/०७/२०१६ व १९/१२/२०१६ च्या शासन निर्णयांन्वये परिविक्षाधीन उपजिल्हाधिकारी ८ व तहसीलदार- ९ यांच्यासाठी १७ अधिसंख्य पदे निर्माण केली आहेत. सदरहू परिविक्षाधीन उपजिल्हाधिकारी व परिविक्षाधीन तहसीलदार यांना त्यांचे दि.०२/०५/२०१६ ते दि.०७/०८/२०१६ या १४ आठवड्यांचे ठोक वेतन "यशदा, पुणे" यांच्यामार्फत, दि.०८/०८/२०१६ ते दि. १५/१०/२०१६ या कालावधीतील नियमित वेतन व दि.०२/०५/२०१६ ते

दि.०७/०८/२०१६ या कालावधीतील नियमित वेतन व ठोक वेतन यामधील फरकाची रक्कम विभागीय आयुक्त, पुणे यांच्या कार्यालयामार्फत व तदनंतरचे दि.१६/१०/२०१६ ते दि.२३/०३/२०१८ या कालावधीतील वेतन संबंधित जिल्हाधिकारी कार्यालयामार्फत अदा करण्याबाबत सूचना दि. ०५/०७/२०१६ च्या शासन निर्णयान्वये देण्यात आल्या आहेत. संदर्भीय क्र. ३, ४ व ५ येथील शासन निर्णय दि. १५/१०/२०१६ व दि. १९/१०/२०१६ अन्वये सोबतच्या यादीमध्ये दर्शविल्याप्रमाणे जिल्ह्याच्या आस्थापनेवर सोबतच्या यादीतील संबंधित जिल्हाधिकारी कार्यालयास वर्ग करण्यात आली आहेत.

विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे यांनी संदर्भिय क्र. ६ येथील पत्रान्वये सदरहू परिविक्षाधीन अधिका-यांचे १४ आठवड्यांचे प्रशिक्षण पूर्ण झाल्यानंतर दि. १५/०८/२०१६ पासून नियमित वेतन तसेच यशदा, पुणे यांच्याकडून दि.०२/०५/२०१६ ते दि. १४/०८/२०१६ या कालावधीत अदा करण्यात आलेले ठोक वेतन व नियमित वेतन यामधील फरकाची रक्कम त्यांना वर्ग केलेल्या जिल्हाधिकारी यांनी आहरीत करण्याबाबत शासन निर्णयात दुरुस्ती करण्याची विनंती केली आहे. याबाबत विचारांती शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.-

**शासन निर्णय:-**

सदरहू ८ परिविक्षाधीन उपजिल्हाधिकारी व ९ परिविक्षाधीन तहसीलदार यांना दि. १५/०८/२०१६ पासून नियमित वेतन देण्याबाबत तसेच दि. ०२/०५/२०१६ ते दि. १४/०८/२०१६ या कालावधीतील यशदा, पुणे यांनी प्रशिक्षण कालावधीत सदर परिविक्षाधीन अधिका-यांना दिलेल्या प्रत्येकी रु. ३०,०००/- दरमहा ठोक वेतनाचे समायोजन करुन उक्त कालावधीतील त्यांच्या नियमित वेतनातील थकबाकी अदा करण्याबाबतची कार्यवाही विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे यांच्या ऐवजी सोबतच्या सहपत्रातील नमूद केलेल्या जिल्हाधिकारी कार्यालयाच्या आस्थापनेवरुन अदा करण्यास शासन मान्यता देत आहे. विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे यांनी, संबंधित जिल्हाधिकारी यांच्याकडे, परिविक्षाधीन उपजिल्हाधिकारी व परिविक्षाधीन तहसीलदार यांचा सेवार्थ वर्ग करण्याची कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत असून महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला आहे. त्याचा संगणक संकेताक २०१७०११७१३३४२६४७१९ असा आहे. उक्त शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Sambhaji C Mondkar

Digitally signed by Sambhaji C Mondkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=498986dde0d282daba86b0acfc9c21d4f9594cc3a6d64857d6a53c9b86d5509b, cn=Sambhaji C Mondkar
Date: 2017.01.17 13:54:25 +05'30'

( सं. चं. मोंडकर )
सह सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
२) महासंचालक, यशदा, पुणे.
३) प्रधान महालेखापाल-१(लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
४) जिल्हाधिकारी, ठाणे/सोलापूर/नंदूरबार/ बीड/ हिंगोली/ वाशिम/ गडचिरोली/ चंद्रपूर/ सिंधुदुर्ग/ धुळे/ जालना/ परभणी/ बुलढाणा/ भंडारा/ गोंदिया.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे/सोलापूर/नंदूरबार/ बीड/ हिंगोली/ वाशिम/ गडचिरोली/ चंद्रपूर/ सिंधुदुर्ग/ धुळे/ जालना/ परभणी/ बुलढाणा/ भंडारा/ गोंदिया.
६) उप सचिव (कार्यासन व्यय-९/वित्तीय सुधारणा-१) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७) अवर सचिव ( कार्यासन-१८-ब) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८) सह सचिव/उप सचिव (कार्यासन ब-१/ई-२/ई-३) महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.
९) निवड नस्ती, कार्यासन ई-८, महसूल व वन विभाग, मुंबई-३२.

**(शासन निर्णय क्रमांक : ईएसटी-२०१६/प्र.क्र.११२/ई-८, दि. १७ /०१/२०१७ सोबतचे सहपत्र)**

एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम -२ अंतर्गत परिविक्षाधीन उपजिल्हाधिकारी व तहसीलदार यांना विविध विभांगामार्फत खातेनिहाय संलग्न प्रशिक्षण, जिल्हास्तरीय प्रशिक्षण व स्वतंत्र कार्यभार- ६६ आठवड्यांच्या प्रशिक्षणासाठी जिल्हा वाटप

**उपजिल्हाधिकारी संवर्ग**

| अ. क्र. | विभाग | जिल्हा | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १ | कोकण | ठाणे | १ |
| २ | नाशिक | नंदूरबार | १ |
| ३ | पुणे | सोलापूर | १ |
| ४ | औरंगाबाद | बीड | १ |
| | | हिंगोली | १ |
| ५ | अमरावती | वाशिम | १ |
| ६ | नागपूर | गडचिरोली | १ |
| | | चंद्रपूर | १ |
| | **एकूण** | | ८ |

**तहसीलदार संवर्ग**

| अ.क्र. | विभाग | जिल्हा | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १ | कोकण | सिंधुदुर्ग | १ |
| २ | नाशिक | धुळे | १ |
| ३ | पुणे | सोलापूर | १ |
| ४ | औरंगाबाद | जालना | १ |
| | | परभणी | १ |
| ५ | अमरावती | बुलढाणा | १ |
| | | वाशिम | १ |
| ६ | नागपूर | भंडारा | १ |
| | | गोंदिया | १ |
| | **एकूण** | | ९ |